# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
**शासन आदेश क्रमांकः कअनि -१११९/प्र.क्र.५२/१४-ब**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मुंबई ४०००३२.
दिनांक: ०१ ऑक्टोबर, २०१९

## आदेश

श्रीमती सु.ना.पोरे, कक्ष अधिकारी, नियोजन विभाग यांच्या सेवा “महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग” यांच्या अधिपत्याखालील राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय, निर्मल भवन, २ रा मजला, नरीमन पॉईंट, मुंबई या कार्यालयातील कक्ष अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने एक वर्षाच्या कालावधीसाठी खालील अटींच्या अधीन राहून सुपूर्द करण्यात येत आहेत.

अ) श्रीमती पोरे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल त्यानंतर एक वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) श्रीमती पोरे यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा ..इ) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट - दोन) मधील तरतुदी विचारात घेऊन सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्र.१८ तसेच नियोजन विभाग यांनी प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, आपापसात सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

३. श्रीमती पोरे, कक्ष अधिकारी यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्र.१८ व नियोजन विभाग यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

**४. श्रीमती पोरे, कक्ष अधिकारी यांच्या सेवा राज्य विधानसभा निवडणूक २०१९ करिता अधिग्रहित करण्यात आल्या असल्यास त्यांनी प्रथमत: निवडणूक कामकाजासाठी विहीत केलेले कर्तव्य बजावणे आवश्यक राहील. त्यांनतरच त्यांना प्रतिनियुक्तीसाठी कार्यमुक्त करावे**.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१००११२०१०७०२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.10.01 12:02:34 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्रीमती सु.ना.पोरे, कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई .

प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीस्तव :-

१) अपर मुख्य सचिव (र.व.का.) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) मा.राज्य मुख्य लोकसेवा हक्क आयुक्त, निर्मल भवन, २ रा मजला, नरीमन पॉईंट, मुंबई.
३) सह/उप सचिव, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालय, निर्मल भवन, २ रा मजला, नरीमन पॉईंट, मुंबई.
४) सह/ उप सचिव (र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५) सह/ उप सचिव (आस्थापना) , नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
त्यांना विनंती करण्यात येते की, प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती नमूद केलेल्या आदेशाची एक प्रत या कार्यासनाकडे पाठविण्यात यावी.
६) निवडनस्ती (कार्या-१४ब).